**महाराष्ट्र शासन**

**क्रमांक: सावियो-२०२२/प्र. क्र. ५६ /अजाक** **सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०३ ऑगस्ट, २०२३.

**विषय**: भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना
मौजा अड्याळ तुकूम, ता. ब्रम्हपुरी, जि. चंद्रपूर येथे विपश्यना केंद्र उभारण्याबाबत.

**संदर्भ**: १. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र, दिनांक १९ ऑक्टोबर, २०२२.
२. शासन ज्ञापन, समक्रमांक, दिनांक ०६ जून, २०२३.
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०५ जानेवारी, २०१५.

**ज्ञापन:**

संदर्भांकित दिनांक ०६ जून, २०२३चे शासन ज्ञापन रद्द करण्यात येत आहे.

२. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भांकित पत्रान्वये भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजनेंतर्गत मौजा अड्याळ तुकूम, ता. ब्रम्हपुरी, जि. चंद्रपूर येथे विपश्यना केंद्र उभारण्याबाबतचा प्रस्ताव सादर केलेला आहे.

३. मौजा अड्याळ तुकूम, ता. ब्रम्हपुरी, जि. चंद्रपूर येथे विपश्यना केंद्र उभारण्याच्या कामासाठी उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, ब्रम्हपुरी यांनी तयार केलेले मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे परिपत्रक, दिनांक १९ एप्रिल, २०२१मधील दरसूचीवर आधारित रुपये १४,९९,२२,०००/- इतक्या किंमतीचे अंदाजपत्रक सादर करण्यात आलेले आहे.

४. सदर अंदाजपत्रकाची सार्वजनिक बांधकाम विभागाने (क्षेत्रिय) तपासणी करुन सदर अंदाजपत्रकास क्षेत्रिय स्तरावरील सर्वोच्च तांत्रिक अधिकारी असलेल्या संबंधित मुख्य अभियंता म्हणजेच मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांची तांत्रिक सहमती (Technical Approval) प्राप्त झालेली आहे. त्यानुसार रुपये १४,९९,२२,०००/- इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. सदर मान्यता शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १७ एप्रिल, २०१५ व २० सप्टेंबर, २०१९ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-१, उप विभाग-पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेंतर्गत परिच्छेदांखालील प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमधील परिच्छेद क्रमांक १३४ (१) अनुक्रमांक ३ अन्वये प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

६. सदर मौजा अड्याळ तुकूम, ता. ब्रम्हपुरी, जि. चंद्रपूर येथे विपश्यना केंद्र उभारण्याबाबतच्या कामासाठी येणारा खर्च :

मागणी क्रमांक एन-३
मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व
अल्पसंख्यांक यांचे कल्याण,
०१, अनुसूचित जातींचे कल्याण,
(०४) भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना
(०४) (०१) भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना
(अ.जा.उ.यो.) (कार्यक्रम)
२७, लहान बांधकामे
२२२५ F ०८५

या अंतर्गत सन २०२३-२४ या चालू वर्षासाठी उपलब्ध असलेल्या निधीमधून भागविण्यात यावा.

७. सदर विपश्यना केंद्र उभारणीची सुरुवात सन २०२३-२४ या आर्थिक वर्षापासून सुरु करण्यात यावी.

८. संदर्भांकित परिपत्रकाप्रमाणे म्हणजेच सन २०२३-२४ या वर्षासाठी रुपये ५००.०० लक्ष निधी वितरीत करण्यात येत आहे. तद्नंतर सन २०२४-२५ व २५-२६ या वर्षांसाठी अनुक्रमे रुपये ५००.०० लक्ष व रुपये ४९९.२२ लक्ष निधी वितरित करण्यात येईल.

९. सन २०२३-२४साठी वितरित करण्यात आलेल्या रुपये ५००.०० लक्ष निधीचा विनियोग झाल्याचे जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांच्या स्वाक्षरीचे कागदपत्रे/ उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. सदर कागदपत्रे/ उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर झाल्यावर या कार्यासनाशी (अजाक) संबंधित अधिकारी प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग, नागपूर किंवा सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, चंद्रपूर यांच्यासह प्रस्तुत विपश्यना केंद्राची स्थळ पाहणी करतील. सदर संबंधित अधिकारी स्थळ पाहणी करुन पुढील वर्षासाठी निधी वितरित करण्याबाबत ना हरकत प्रमाणपत्र देतील. सदर ना हरकत प्रमाणपत्र दिल्यानंतर सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, चंद्रपूर यांच्यामार्फत दुसऱ्या वर्षासाठी निधीची मागणी करण्यात यावी. त्यानंतर शासनाकडून प्रस्तुत प्रस्तावास निधी वितरित करण्यात येईल.

१०. सदर मौजा अड्याळ तुकूम, ता. ब्रम्हपुरी, जि. चंद्रपूर येथे विपश्यना केंद्र उभारणी करताना विषयांकित योजनेचे नियम, तरतुदी, बाबी, अटी आणि वित्तीय अधिकारांतर्गत असलेल्या अटी यांचे पालन होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

११. सदर ज्ञापन शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १७ एप्रिल, २०१५ व २० सप्टेंबर, २०१९ यातील तरतुदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०८०३१७०७१७८६२२ असा आहे. सदर ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN VILAS SHISHUPAL

Digitally signed by PRAVIN VILAS SHISHUPAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e90b11f238d671a8222f53575baf1f02e1625f1f53f35c695b531bcd5b6b83fa, pseudonym=4AD2EFB239F4E872E96102C1F3E1F196C4C98B39, serialNumber=CBD05D0EA86861C0C1248FD89817636DDFBE5E50BA12759A0FE7E022D790310B, cn=PRAVIN VILAS SHISHUPAL
Date: 2023.08.03 17:09:41 +05'30'

**( प्रविण शिशुपाल )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. जिल्हाधिकारी, चंद्रपूर,
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर,
४. मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक (विद्युत) विभाग, नागपूर,
५. प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग, नागपूर,
६. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर,
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागभिड, जि. चंद्रपूर,
८. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, चंद्रपूर,
९. उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, ब्रम्हपुरी, जि. चंद्रपूर,
१०. मुख्य अधिकारी, नगर परिषद, ब्रम्हपुरी, जि. चंद्रपूर.